**केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य" या योजनेंतर्गत नगरपरिषद/ नगरपंचायत/महानगरपालिकांच्या विकास योजना आराखडयातील विकास कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सिआयडी-३३२४/सं.क्र.३९१/प्र.क्र.३४/नवि-१०**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य" या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून राज्य शासनास निधी प्राप्त होत आहे. या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन विविध नगरपरिषद/ नगरपंचायत/ महानगरपालिका यांच्या विकास योजना आराखडयातील चालू असलेल्या कामांना निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सन २०२४-२५ च्या प्रस्तावित निधीतून सदर योजना राबविण्यासाठी विभागीय सहसंचालक, नगर रचना, कार्यालयाच्या स्तरावरून विहित कार्यपद्धती अवलंबून योजनेंतर्गत प्रकल्पांकरिता वास्तुविशारद संस्थेची नेमणूक करण्यात आली आहे. सदर वास्तुविशारद संस्थेमार्फत तयार करण्यात आलेल्या प्रस्तावित विकास कामांच्या नकाशांना संबंधित सहसंचालक, नगर रचना/ सहायक संचालक, नगर रचना यांचे स्तरावरून मंजुरी देण्यात आली आहे. वास्तुविशारद संस्थेकडून उक्त प्रकल्पांतर्गतच्या विकास कामांची अंदाजपत्रके तयार करून, त्यांना तांत्रिक मंजुरी मिळण्यासाठीचे प्रस्ताव, संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी/प्रशासक, नगरपरिषद/नगरपंचायत/महानगरपालिका यांनी "सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित कार्यालय किंवा संचालक, उपवने व उद्याने" यांचेकडे सादर करुन, अशा विकास कामांच्या अंदाजपत्रकांना, तांत्रिक मंजुरी प्राप्त करुन घेतल्या आहेत. केंद्र शासनाच्या भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य योजना-२०२४-२५ या प्रस्तावित योजनेंतर्गत नगरपरिषद/ नगरपंचायत कागल, कुरुंदवाड, पाचोरा, कुळगाव-बदलापूर, चिपळून, खेड, अकोट, मुर्तिजापुर, बुलढाणा, चिखली, देऊळगाव राजा, खामगाव, पुसद, उमरखेड, वणी, भिवापूर, कुही, नरखेड, परशिवनी, पुलगाव, भंडारा, पवनी, गांदिया, पुलगाव यांच्या विकास योजना आराखडयातील कामांना संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेस अनुसरुन प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य योजना-२०२४-२५" या प्रस्तावित योजनेंतर्गत नगरपरिषद/ नगरपंचायत कागल, कुरुंदवाड, पाचोरा, कुळगाव-बदलापूर, चिपळून, खेड, अकोट, मुर्तिजापुर, बुलढाणा, चिखली, देऊळगाव राजा, खामगाव, पुसद, उमरखेड, वणी, भिवापूर, कुही, नरखेड, परशिवनी, पुलगाव, भंडारा, पवनी, गांदिया, पुलगाव यांच्या सोबतच्या **परिशिष्ट-अ मध्ये** नमूद विकास योजना आराखडयातील **रु.६३,२८,३६,०४९/-** (अक्षरी त्रेसष्ट कोटी अठ्ठाविस लाख छत्तीस हजार एकोणपन्नास फक्त) च्या कामांना संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेस अनुसरुन या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

०२. **सदर योजनेच्या अंमलबजावणीसंदर्भात खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.**

**अ) प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा व अंमलबजावणी संबंधित सूचना:**

१) सदर योजनेंतर्गत प्रकल्पांची अंमलबजावणी संबंधित नगरपरिषद/ नगरपंचायत/महानगरपालिका यांचेमार्फत करण्यात यावे.

२) सदर प्रकल्पांची अंमलबजावणी करताना केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या या संदर्भातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे अंमलबजावणी यंत्रणेवर बंधनकारक राहील.

३) सदर योजनेंतर्गत प्रकल्पाचे काम इतर कुठल्याही योजनेमधून करण्यात आलेले नाही, याची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी/प्रशासक महानगरपालिका/ नगरपरिषद/ नगरपंचायत यांची राहील. यानुसार कार्यवाही न झाल्यास, संबंधित नागरी स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी, त्यावरील व्याजासह शासनास परत करणे बंधनकारक राहील.

४) सदर योजनेंतर्गत प्रकल्पाच्या मूळ किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. राज्य शासनामार्फत किंवा केंद्र शासनाच्या निधीतून त्याकरिता कोणताही वाढीव नियतव्यय उपलब्ध केला जाणार नाही, याची सर्व संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडुन नोंद घेण्यात यावी.

५) सदर निधीमधून मंजूर प्रकल्पांसाठी केंद्र शासनाच्या निधीची द्विरुक्ती होणार नाही याची जबाबदारी कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

६) निविदेत नमुद केलेनुसार कामाची प्रगती राखण्यात यावी व निधीच्या उपलब्धतेनुसार देयक अदा करणेबाबत कार्यवाही करणेची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

७) सदर योजनेंतर्गत उपलब्ध होणारा निधी त्याच उद्दिष्टांसाठी खर्च करण्याची जबाबदारी तसेच कामांची गुणवत्ता शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मानकांप्रमाणे करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

८) सदर कामे सुरु करण्यापूर्वीच्या स्थितीचे, काम सुरु असलेल्या विविध टप्प्यावर व काम पूर्ण झाल्यानंतरच्या स्थितीचे अक्षांश रेखांशसह छायाचित्र (Geotag Photo) काढून ठेवणे व मागणीनुसार सादर करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

९) सदर योजनेंतर्गत निधीचा विनियोग विहीत कार्यपद्धतीस अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहीत प्रक्रियेचे अवलंबन करुन खर्च करण्यात यावा. याबाबत शासनाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयांचे व सूचनांचे पालन करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

१०) योजनेंतर्गत प्रकल्पाकरिता निधी खर्च करुन संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी /प्रशासक महानगरपालिका/ नगरपरिषद/ नगरपंचायत यांनी विहित प्रपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र व खर्चाचा तपशील संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे वेळोवेळी दिलेल्या सुचननेनुसार तातडीने सादर करावा. तसेच, त्याची एक प्रत संचालक, नगरपरिषद संचालनालय, नवी मुंबई यांच्याकडे तातडीने पाठवावी तसेच योजनेंतर्गत गैरव्यवहार/ लेखा आक्षेप, लोकलेखा समिती, विधीमंडळ कामकाज इ. संदर्भात अंमलबजावणी यंत्रणा जबाबदार राहतील.

११) सदर योजनेंतर्गत प्रकल्पांमुळे निर्माण होणा-या मालमत्तांची नोंद स्थावर मालमत्ता नोंदवहीमध्ये घेणेची कार्यवाही संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी/प्रशासक महानगरपालिका/ नगरपरिषद/ नगरपंचायत यांचेकडून करण्यात यावी.

१२) अंमलबजावणी यंत्रणांनी प्रकल्पाचा लेखा ठेवून महालेखापाल यांना सादर करुन जतन करावा व उपयोगिता प्रमाणपत्र विहित प्रपत्रात सादर करावीत.

**ब) निविदा प्रक्रिया:**

१) सदर योजनेंतर्गत प्रकल्पास प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर त्वरीत निविदा काढण्यात येतील.

२) सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया राबविताना या संबंधित यासंदर्भातील शासनाचे प्रचलित नियम / तरतुदींचे काटेकोर पालन करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

**क) कार्यारंभ आदेश:**

१) सदर योजनेंतर्गत प्रकल्पास प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर निविदा प्रक्रिया पूर्ण करण्यात येईल. मात्र शासनाकडून प्रकल्पाच्या मंजुरीबाबत/निधी उपलब्धतेबाबत कळविल्यानंतरच कार्यादेश देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

२) कार्यादेशानंतर त्वरीत विकास कामांचा प्रत्यक्ष आरंभ करणे बंधनकारक राहील. निविदेतील अटी/शर्तीप्रमाणे प्रकल्पाच्या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी/प्रशासक, महानगरपालिका/ नगरपरिषद/ नगरपंचायत यांची राहील.

३) सदर कामे सुरु करण्यापूर्वी प्रकल्पांच्या क्षेत्रात कुठलीही सार्वत्रिक निवडणुक/ पोट निवडणुकीची आचारसंहिता अंमलात नाही, याची खातरजमा कार्यान्वयीन यंत्रणेकडून करण्यात यावी. तसेच निवडूण आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

**ड) प्रकल्पांचे त्रयस्थ यंत्रणेकडून तांत्रिक परीक्षण:**

सदर योजनेंतर्गत प्रकल्पांचे काम गुणवत्तापूर्ण पद्धतीने व्हावीत व त्यातून टिकाऊ मत्ता निर्माण व्हाव्यात, यासाठी प्रकल्प अंमलबजावणीच्या विविध टप्प्यांवर महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या यंत्रणांकडून “त्रयस्थ यंत्रणेकडून तांत्रिक परीक्षण” (Third Party Technical Audit) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करुन घेणे बंधनकारक राहील. त्रयस्थ यंत्रणेचा अहवालाची प्रत त्वरीत संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण विभाग, पुणे, संचालक, नगर परिषद संचालनालय, नवी मुंबई व शासनास सादर करण्यात यावी.

**इ) प्रकल्पांची देखभाल व दुरुस्ती**:

सदर योजनेंतर्गत प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत करण्यात यावे. जेणेकरुन, सदर प्रकल्पातून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वतपणे उपयोगात राहील. प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीसाठी या योजनेंतर्गत कोणताही निधी उपलब्ध होणार नाही. आवश्यक देखभाल दुरुस्ती नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या निधीतून करणे बंधनकारक राहील.

**फ) अंमबजावणीसंदर्भात अन्य सूचना** :-

१) केंद्र शासनाने विहित केल्यानुसार निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे दाखल करणे आवश्यक असते ही बाब विचारात घेऊन कामाच्या प्रगतीनुसार निधीचे वितरण करण्यात यावे.

२) केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या सूचनांना अनुसरुन संबंधित महानगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत कडून सत्वर कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१५१५०११४०५२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सोबत: **परिशिष्ट- अ**

SHINDE SUBRAO NARAYAN

Digitally signed by SHINDE SUBRAO NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVERNMENT OF MAHARASHTRA, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SHINDE SUBRAO NARAYAN
Date: 2024.03.15 15:10:20 +05'30'

**(सु.ना.शिंदे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री,मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (गृह), मंत्रालय, मुंबई.

५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे.
११. संचालक, नगर परिषद संचालनालय, नवी मुंबई
१२. मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत (कागल, कुरुंदवाड, पाचोरा, कुळगाव-बदलापूर, चिपळून, खेड, अकोट, मुर्तिजापुर, बुलढाणा, चिखली, देऊळगाव राजा, खामगाव, पुसद, उमरखेड, वणी, भिवापूर, कुही, नरखेड, परशिवनी, पुलगाव, भंडारा, पवनी, गांदिया, पुलगाव)
१३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
१४. महालेखापाल, (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर.
१५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. संचालक, स्थानिक निधी लेखा परिखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१८. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परिशा, कोकण/पुणे/नाशिक/छ.संभाजीनगर/अमरावती/नागपूर.
१९. सह सचिव (नवि-१०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. उप सचिव (नवि-४, नवि-३१, नवि-३३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती (नवि-१०).

**परिशिष्ट- अ**

| केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य" या योजनेंतर्गत प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्र.सिआयडी-३३२४/सं.क्र.३९१/प्र.क्र.३४/नवि-१०, दि.१५.०३.२०२४ चे जोडपत्र. | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रकल्पाचा तपशिल आ. क्र. /स्थान, नाव अंदाजे क्षेत्र (हेक्टर) | वास्तुविशारद संस्थेचे नाव व नेमणुकीचे पत्र क्र. व दि. | अंदाजपत्रकीय रक्कम | प्रस्तावित विकास कामाच्या नकाशास मंजुरीचे पत्र क्र. व दि. | तांत्रिक मान्यता आदेश क्र. व दि. | तांत्रिक मान्यता | प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम |
| पुणे विभाग | | | | | | | | | |
| १ | कोल्हापूर | कागल नगर परिषद | आ. क्र. १- पिकनिक सेंटर (३२.१) | वल्हेकर व असोसिएट्स पत्र क्र. २१३३ दि.२९/१२/२०२३ | ₹ ६४,३३६,१३७ | पत्र क्र. ३५९, दि.०१/०३/२०२४ | पत्र क्र. १९२५, दि.०५/०३/२०२४ | ₹ ४९,४६१,४९२ | ₹ ६४,३३६,१३७ |
| २ | कोल्हापूर | कुरुंदवाड नगर परिषद | आ. क्र. ५२ भाजी मंडई (०.१९ हे.) | वल्हेकर व असोसिएट्स पत्र क्र. २१३३ दि.२९/१२/२०२३ | ₹ २०,०००,००० | पत्र क्र. २२६, दि.१३/०२/२०२४ | पत्र क्र. २००५, दि.०६/०३/२०२४ | ₹ १६,३८८,००० | ₹ २०,०००,००० |
| | | | | | | | | ₹ ६५,८४९,४९२ | ₹ ८४,३३६,१३७ |
| नाशिक विभाग | | | | | | | | | |
| ३ | जळगाव | पाचोरा नगर परिषद | आ. क्र. ८९- बगीचा | बी. टी. कडलग, नाशिक पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | ₹ १०,०२०,००० | पत्र क्र. २६०, दि.२०/०२/२०२४ | पत्र क्र. १६८५, दि.०७/०३/२०२४ | ₹ ९,९४४,००० | ₹ १०,०२०,००० |
| | | | | | | | | ₹ ९,९४४,००० | ₹ १०,०२०,००० |
| कोकण विभाग | | | | | | | | | |
| ४ | ठाणे | कुळगाव बदलापूर नगर परिषद | आ. क्र. ११- वाहनतळ (०.२) | अर्बन पंडीत इंफ्रा कंसल्टंट पत्र क्र. ६५, दि.१०/०१/२०२४ | ६७६५९६५० | पत्र क्र. २१६, दि.०९/०२/२०२४ | पत्र क्र. १२३०, दि.०७/०३/२०२४ | ₹ ६७,६५९,६५० | ₹ ६७,६५९,६५० |
| ५ | रत्नागिरी | चिपळूण नगर परिषद | न. र. यो. १ अंतिम भूखंड १३०- मार्केट (०.३५) | आर्कमिडिया व डेल्कॉन कंसल्टंट इंडिया पत्र क्र. २९००, दि.२९/१२/२०२३ | ₹ १३,५५२,७२८ | पत्र क्र. १८६, दि.०६/०२/२०२४ | पत्र क्र. १२३८, दि.०५/०३/२०२४ | ₹ १३,५५२,७२८ | ₹ १३,५५२,७२८ |
| ६ | रत्नागिरी | चिपळूण नगर परिषद | न. र. यो. १ अंतिम भूखंड ११- वाहनतळ (०.३५) | आर्कमिडिया व डेल्कॉन कंसल्टंट इंडिया पत्र क्र. २९००, दि.२९/१२/२०२३ | ₹ ७,६३२,३३९ | पत्र क्र. ३२९, दि.०६/०२/२०२४ | पत्र क्र. १९३०, दि.०५/०३/२०२४ | ₹ ७,६३२,३३९ | ₹ ७,६३२,३३९ |

| अ.क्र. | जिल्हा | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रकल्पाचा तपशिल आ. क्र. /स्थान, नाव अंदाजे क्षेत्र (हेक्टर) | वास्तुविशारद संस्थेचे नाव व नेमणुकीचे पत्र क्र. व दि. | अंदाजपत्रकीय रक्कम | प्रस्तावित विकास कामाच्या नकाशास मंजुरीचे पत्र क्र. व दि. | तांत्रिक मान्यता आदेश क्र. व दि. | तांत्रिक मान्यता | प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | रत्नागिरी | खेड नगर परिषद | न. र. यो. अंतिम भूखंड १२१- दवाखाना (२.२९) | आर्कमिडिया व डेल्कॉन कंसल्टंट इंडिया पत्र क्र. २९००, दि.२९/१२/२०२३ | ₹ २४,०५३,१८२ | पत्र क्र. १८४, दि.०६/०२/२०२४ | पत्र क्र. १२३९, दि.०५/०३/२०२४ | ₹ २४,०५३,१८२ | ₹ २४,०५३,१८२ |
| | | | | | | | | ₹ ११२,८९७,८९९ | ₹ ११२,८९७,८९९ |
| अमरावती विभाग | | | | | | | | | |
| ८ | अकोला | अकोट नगर परिषद | आ. क्र. ४८- दुकान केंद्र (०.७४९४) | डी स्टुडीओ आर्किटेक्ट्स पत्र क्र. १६०५, दि.१९/१२/२०२३ | ₹ १५,६२७,३७६ | पत्र क्र. २५४, दि.२१/०२/२०२४ | पत्र क्र. २४८०, दि.०७/०३/२०२४ | १४५३००६८ | ₹ १५,६२७,३७६ |
| ९ | अकोला | मुर्तिजापूर नगर परिषद | आ. क्र. २६- आठवडी बाजार (४.३५) | डी स्टुडीओ आर्किटेक्ट्स पत्र क्र. १६०५, दि.१९/१२/२०२३ | ₹ ४१,३३९,००० | पत्र क्र. २५१, दि.२१/०२/२०२४ | पत्र क्र. १०१०, दि.०७/०३/२०२४ | ४०९८७४०१ | ₹ ४१,३३९,००० |
| १० | बुलढाणा | बुलढाणा नगर परिषद | सार्वजनिक निमसार्वजनिक विभाग- प्राथमिक शाळा (०.४५) | आर्किटेक्ट राजेंद्र गट्टानी व असोसिएट्स पत्र क्र. १६०४, दि.१९/१२/२०२३ | ₹ २३,६६५,६७४ | पत्र क्र. २२२, दि.१६/०२/२०२४ | पत्र क्र. २४७६ दि.०७/०३/२०२४ | ₹ २२,१५४,१४८ | ₹ २३,६६५,६७४ |
| ११ | बुलढाणा | चिखली नगर परिषद | आ. क्र. ९- प्राथमिक शाळा व खेळाचे मैदान | आर्किटेक्ट राजेंद्र गट्टानी व असोसिएट्स पत्र क्र. १६०४, दि.१९/१२/२०२३ | ₹ १९,४००,८२३ | पत्र क्र. २२३, दि.१६/०२/२०२४ | पत्र क्र. २४७४, दि.०७/०३/२०२४ | १८१८६६८५ | ₹ १९,४००,८२३ |
| १२ | बुलढाणा | देऊळगावराजा नगर परिषद | आ. क्र. ७०- दुकान केंद्र (०.११) | आर्किटेक्ट राजेंद्र गट्टानी व असोसिएट्स पत्र क्र. १६०४, दि.१९/१२/२०२३ | ₹ १५,०००,००० | पत्र क्र. २२५, दि.१६/०२/२०२४ | पत्र क्र. २४७३, दि.०७/०३/२०२४ | ₹ १६,३२४,६६३ | ₹ १७,६८२,५४३ |
| १३ | बुलढाणा | खामगाव नगर परिषद | सार्वजनिक निमसार्वजनिक विभाग- दुकान केंद्र (०.०९८) | आर्किटेक्ट राजेंद्र गट्टानी व असोसिएट्स पत्र क्र. १६०४, दि.१९/१२/२०२३ | ₹ १४,७४८,३२३ | पत्र क्र. २२४, दि.१६/०२/२०२४ | पत्र क्र. २४७५, दि.०७/०३/२०२४ | ₹ १३,७६०,२८६ | ₹ १४,७४८,३२३ |

| अ.क्र. | जिल्हा | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रकल्पाचा तपशिल आ. क्र. /स्थान, नाव अंदाजे क्षेत्र (हेक्टर) | वास्तुविशारद संस्थेचे नाव व नेमणुकीचे पत्र क्र. व दि. | अंदाजपत्रकीय रक्कम | प्रस्तावित विकास कामाच्या नकाशास मंजुरीचे पत्र क्र. व दि. | तांत्रिक मान्यता आदेश क्र. व दि. | तांत्रिक मान्यता | प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १४ | यवतमाळ | पुसद नगर परिषद | आ. क्र. ३८ क- वाचनालय (०.२) | डी स्टुडीओ आर्किटेक्ट्स पत्र क्र. १६०३, दि.१९/१२/२०२३ | ₹ ७,७१४,५०० | पत्र क्र. २२८, दि.१६/०२/२०२४ | पत्र क्र. १५६०, दि.०६/०३/२०२४ | ₹ ७,७१४,५०० | ₹ ७,७१४,५०० |
| १५ | यवतमाळ | उमरखेड नगर परिषद | आ. क्र. ३६- प्राथमिक शाळा (०.१०९१) | डी स्टुडीओ आर्किटेक्ट्स पत्र क्र. १६०३, दि.१९/१२/२०२३ | ₹ २०,०००,००० | पत्र क्र. ९०२, दि.११/०५/२०२२ | पत्र क्र. ५३१३, दि.२९/११/२०२२ | ₹ १९,००७,९७२ | ₹ २०,०००,००० |
| १६ | यवतमाळ | वणी नगर परिषद | आ. क्र. २९- सांस्कृतिक केंद्र (०.२५) | डी स्टुडीओ आर्किटेक्ट्स पत्र क्र. १६०३, दि.१९/१२/२०२३ | ₹ ५०,८४७,००९ | पत्र क्र. ३०८, दि.२६/०२/२०२४ | पत्र क्र. १७१२, दि.०७/०३/२०२४ | ₹ ५०,८४७,००९ | ₹ ५०,८४७,००९ |
| १७ | यवतमाळ | वणी नगर परिषद | आ. क्र. ६७- ट्रक टर्मिनस (१४.९६) | डी स्टुडीओ आर्किटेक्ट्स पत्र क्र. १६०३, दि.१९/१२/२०२३ | ₹ ६१,६४७,०५४ | पत्र क्र. २२७, दि.१६/०२/२०२४ | पत्र क्र. १७१३, दि.०७/०३/२०२४ | ₹ ५७,०२१,०६६ | ₹ ६१,६४७,०५४ |
| | | | | | | | | ₹ २६०,५३३,७९८ | ₹ २७२,६७२,३०२ |
| नागपूर विभाग | | | | | | | | | |
| १८ | नागपूर | भिवापूर नगर पंचायत | आ. क्र. ८- आठवडी बाजार (०.६२) | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | १३१६७६३२ | पत्र क्र. ३९२, दि.०१/०३/२०२४ | पत्र क्र. २७२९, दि.०६/०३/२०२४ | ९९९९९३६ | १३१६७६३२ |
| १९ | नागपूर | भिवापूर नगर पंचायत | स. क्र. ३२०- दुकान केंद्र | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | २३२७४८८१ | पत्र क्र. ३९२, दि.०१/०३/२०२४ | पत्र क्र. २७३६, दि.०६/०३/२०२४ | १७१६००६१ | २३२७४८८१ |
| २० | नागपूर | कुही नगर पंचायत | आ. क्र. ११- फिश मार्केट (०.२२) | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | ३२०१४०४ | पत्र क्र. ३०३, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. ५२५, दि.०५/०३/२०२४ | २४७६६२५ | ३२०१४०४ |

| अ.क्र. | जिल्हा | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रकल्पाचा तपशिल आ. क्र. /स्थान, नाव अंदाजे क्षेत्र (हेक्टर) | वास्तुविशारद संस्थेचे नाव व नेमणुकीचे पत्र क्र. व दि. | अंदाजपत्रकीय रक्कम | प्रस्तावित विकास कामाच्या नकाशास मंजुरीचे पत्र क्र. व दि. | तांत्रिक मान्यता आदेश क्र. व दि. | तांत्रिक मान्यता | प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २१ | नागपूर | कुही नगर पंचायत | आ. क्र. १०- मटन मार्केट (०.६) | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | ३६३६००४ | पत्र क्र. ३०३, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. ५२६, दि.०५/०३/२०२४ | २८३१४०१ | ३६३६००४ |
| २२ | नागपूर | नरखेड नगर परिषद | आ. क्र. २४- दुकान केंद्र (०.२४) | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | २६५८७६१६ | पत्र क्र. ३१६, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. २४३९, दि.०७/०३/२०२४ | २३७३७८७३ | २६५८७६१६ |
| २३ | नागपूर | पारशिवनी नगर परिषद | स. क्र. ९५४- दुकान केंद्र (०.०३) | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | १०२५४०३१ | पत्र क्र. ३०३, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. १५१३, दि.०४/०३/२०२४ | ७८२०१६४ | १०२५४०३१ |
| २४ | वर्धा | पुलगाव नगर परिषद | आ. क्र. १६- मच्छी व मटन मार्केट (०.३४) | शून्य कंसल्टंट पत्र क्र. १, दि.०१/०१/२०२४ | ₹ ७,५३५,४०० | पत्र क्र. २९७, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. १९८२, दि.०६/०३/२०२४ | ₹ ५,५१४,२५२ | ₹ ७,५३५,४०० |
| २५ | भंडारा | भंडारा नगर परिषद | आ. क्र. १२- रिक्षा स्टॅंड व इन्फ़ॉर्मल हॉकर्स शॉप | घाटपांडे असोसिएट्स पत्र क्र. २५, दि.०४/०१/२०२४ | ₹ ६,४८१,१७१ | पत्र क्र. २९५, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. २१३४, दि.०६/०३/२०२४ | ₹ ४,७३९,९४५ | ₹ ६,४८१,१७१ |
| २६ | भंडारा | पवनी नगर परिषद | आठवडी बाजार व दुकान केंद्र (०.७९) | घाटपांडे असोसिएट्स पत्र क्र. २५, दि.०४/०१/२०२४ | ₹ २१,२०८,७२५ | पत्र क्र. २९५, दि.२२/०२/२०२४ | पत्र क्र. २६७१. दि.०६/०३/२०२४ | ₹ १४,५३८,४४८ | ₹ २१,२०८,७२५ |

| अ.क्र. | जिल्हा | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रकल्पाचा तपशिल आ. क्र./स्थान, नाव अंदाजे क्षेत्र (हेक्टर) | वास्तुविशारद संस्थेचे नाव व नेमणुकीचे पत्र क्र. व दि. | अंदाजपत्रकीय रक्कम | प्रस्तावित विकास कामाच्या नकाशास मंजुरीचे पत्र क्र. व दि. | तांत्रिक मान्यता आदेश क्र. व दि. | तांत्रिक मान्यता | प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २७ | गोंदीया | गोंदीया नगर परिषद | आ. क्र. S-१२८- दुकान केंद्र (०.२५) | घाटपांडे असोसिएट्स पत्र क्र. २५, दि.०४/०१/२०२४ | ₹ २४,६४८,५४७ | पत्र क्र. ३१४, दि.२३/०२/२०२४ | पत्र क्र. २६७०. दि.०६/०३/२०२४ | ₹ १८,४२६,३०८ | ₹ २४,६४८,५४७ |
| २८ | वर्धा | पुलगाव नगर परिषद | आ. क्र. १२- खेळाचे मैदान (०.८७) | बी. टी. कडलग, नाशिक पत्र क्र. २, दि.०१/०१/२०२४ | ₹ १२,९१४,३०० | पत्र क्र. ३८५, दि.०१/०३/२०२४ | पत्र क्र. १९८३, दि.०६/०३/२०२४ | ₹ ९,९८३,३९० | ₹ १२,९१४,३०० |
| | | | | | | | | ₹ ११७,२२८,४०३ | ₹ १५२,९०९,७११ |
| | | | | | | | **एकूण** | **₹ ५६६,४५३,५९२** | **₹ ६३२,८३६,०४९** |

SHINDE SUBRAO NARAYAN

Digitally signed by SHINDE SUBRAO NARAYAN
DN: CN = SHINDE SUBRAO NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2024.03.15 15:11:20 +05'30'

(सु.ना.शिंदे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन